GR- 20040407143455001-0100

महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई व प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे बरखास्त करण्याबाबत...

गट 'क' ची प्रादेशिक व राज्य स्तरीय पदे भरण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:प्रानिमं-3099/555/प्र.क्र.69-99/13-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 15 जून, 1999.

संदर्भ :- 1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रानिमं-1286/प्र.क्र.86(1)/तेरा-अ, दिनांक 9.2.1988.

2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रानिमं-1095/प्र.क्र.34/95/तेरा-अ, दिनांक 10.11.1995.

## शासन निर्णय

शासनाने महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई तसेच सहा प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे बरखास्त करण्याचा व त्यांचेद्वारे गट "क" संवर्गातील पदे भरण्याची कार्यवाही बंद करण्याचा निर्णय घेतला आहे. जिल्हा स्तरीय गट "क" ची पदे जिल्हाधिका-यांच्या समितीमार्फत भरण्याचे आदेश शासन निर्णय, समक्रमांक दिनांक 11 जून, 1999 अन्वये स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात आलेले आहेत.

प्रादेशिक व राज्य स्तरीय पदे भरण्याबाबत मंत्रालयीन विभागांचे लक्ष शासन निर्णय, क्रमांक आरएसबी-1082/सीआर 186/(भाग-2)/13-अ, दिनांक 18 जून, 83 कडे वेधण्यात येत आहे. (प्रत सोबत जोडली आहे.) त्याचधर्तीवर सर्व मंत्रालयीन विभागांनी प्रादेशिक व राज्य स्तरीय पदे भरण्यासाठी उचित आदेश निर्गमित करावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ना.ना.भडीकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

1. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
2. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
3. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
4. महालेखापाल, महाराष्ट्र-1/2 (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
5. महालेखापाल, महाराष्ट्र-1/2 (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
6. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
7. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
8. * प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्यायशाखा, मुंबई,
9. * प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
10. * प्रबंधक, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
11. * सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
12. * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
13. * सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
14. सर्व विभागीय आयुक्त,
15. सर्व जिल्हाधिकारी,
16. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

17. सर्व मंत्रालयीन विभाग,
18. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
19. सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
20. सर्व सदस्य सचिव, प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे,
21. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

---

* पत्राने.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
निर्णय क्रमांक:आरएसबी-1082-सीआर-186-भाग2-तेरा-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 18 जून, 1983.

## शासन निर्णय

महाराष्ट्र लोकसेवा (दुय्यम) निवड मंडळे (निरसन) अध्यादेश, 1983, दिनांक 18 जून, 1983 रोजी प्रख्यापित करण्यात आला आहे. सदर अध्यादेशाची प्रत सोबत जोडली आहे. या अध्यादेशाच्या प्रख्यापनामुळे महाराष्ट्र लोकसेवा (दुय्यम) निवड मंडळे अधिनियम, 1973, निरसित झाला आहे, त्या अधिनियमान्वये स्थापन करण्यात आलेली सर्व प्रादेशिक व विशेष निवड मंडळे विसर्जित झाली आहेत व त्या निवड मंडळाचे अध्यक्ष व सदस्य आपल्या पदांवरुन तात्काळ मुक्त झाले आहेत.

2. महाराष्ट्र लोकसेवा (दुय्यम) निवड मंडळे अधिनियम, 1973, या अधिनियमाच्या निरसनाबरोबरच महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, 1961, महाराष्ट्र नगरपालिका अधिनियम, 1965 व मुंबई प्राथमिक शिक्षण अधिनियम, 1947, या अधिनियमामध्ये काही दुरुस्त्याही वरील अध्यादेशाद्वारे करण्यात आल्या आहेत. याचा परिणाम असा की राज्य शासन, जिल्हा परिषदा, नगरपालिका, नगरपालिकांची शाळा मंडळे, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांच्या दुय्यम सेवांमधील नेमणुका, त्या त्या सेवांमध्ये सेवा भरती करण्यासाठी राज्य शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार, किंवा जिल्हा परिषदा, नगरपालिका, नगरपालिकांची शाळा मंडळे, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ ज्या कायद्यांन्वये प्रस्थापित झाली आहेत व काम करीत आहेत त्या कायद्यांखाली विहित केलेल्या नियम व विनियमानुसार, संबंधित नियुक्ती प्राधिका-यांनी करावयाची प्रथा पुन्हा अस्तित्वात आली आहे.

3. वरील अध्यादेशामध्ये आणखी अशीही तरतूद करण्यात आली आहे की, अध्यादेश अंमलात येण्याच्या दिनांकास सेवेत असलेल्या व्यक्तींपैकी ज्यांच्या मूळ नेमणूका संबंधित प्राधिकरणांनी विहित केलेले नियम व आदेश यांना धरुन झालेल्या आहेत त्या व्यक्ती काही कारणामुळे निवड मंडळाकरवी नामनिर्देश किंवा शिफारस होऊन नियुक्त झाल्या नसल्या तरीही त्या वैधरित्या नियुक्त झालेल्या आहेत असे मानण्यात यावे.

4. शासनाने असा निर्णय घेतला आहे की, राज्य शासनाच्या दुय्यम सेवांमध्ये नियुक्तीसाठी उमेदवार निवडण्यांची कार्यपद्धती यापुढे खालीलप्रमाणे असावी :-

1) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील वर्ग-3 च्या पदांवरील सेवा भरती पूर्वीप्रमाणेच त्या आयोगाच्या सल्लाने करण्यात यावी.

2) राज्य शासनाच्या सेवेतील वर्ग-3 च्या इतर पदांसाठी उमेदवार निवडण्याचे काम संबंधित नियुक्ती प्राधिका-यांनी पूर्वीप्रमाणे प्रामुख्याने शासकीय अधिका-यांचा अंतर्भाव असलेल्या निवड समित्यांच्या मदतीने करावे. या उमेदवार निवडीसाठी पात्र उमेदवारांच्या याद्या सेवायोजन कार्यालये, समाजकल्याण अधिकारी व उमेदवारांची शिफारस करण्यासाठी शासनाने प्राधिकृत केलेल्या मागासवर्गीयांच्या किंवा अन्य संघटना यांच्याकडून मागवून घ्याव्यां. मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागांनी आदेश काढून निवड समित्यांची स्थापना करावी.

3) प्रादेशिक व विशेष निवड मंडळांच्या विसर्जनानंतर निवड समित्यांची स्थापना होईपर्यंच्या कालावधीत केलेल्या सर्व नेमणुका तात्पुरत्या नेमणुका मानल्या जाव्यात. अशाप्रकारे तात्पुरत्या नेमलेल्या व्यक्तींच्या जागी निवड समित्यांच्या सल्ल्याने नेमलेल्या उमेदवारांच्या नेमणुका होऊ शकतील.

5. उपरोक्त अध्यादेश अंमलात आल्यापासून जिल्हा परिषदा, नगरपालिका, नगरपालिकांची शाळा मंडळे, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांच्या दुय्यम सेवांसाठी उमेदवार निवडण्याची पध्दत खालीलप्रमाणे असावी :-

1) जिल्हा परिषदांच्या वर्ग-3 च्या सेवांसाठी उमेदवार निवडण्याचे काम संबंधित जिल्हा व विभागीय निवड मंडळांनी भूतपूर्व राज्य निवड मंडळाच्या स्थापनेपूर्वी अस्तित्वात असलेल्या प्रथेस अनुसरुन करावे. त्यासाठी महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, 1961 मध्ये आवश्यक त्या दुरुस्त्या अध्यादेशाच्या अनुसूचित दर्शविल्याप्रमाणे करण्यात आल्या आहेत.

2) नगरपालिका व नगरपालिकांची शाळा मंडळे यांच्या दुय्यम सेवांसाठी उमेदवारांची निवड भूतपूर्व राज्य निवड मंडळाच्या स्थापनेपूर्वी अस्तित्वात असलेल्या पध्दतीस अनुसरुन, म्हणजेच निवड समित्या/स्थायी समित्या

इत्यादिद्वारा करण्यात यावी. त्यासाठी महाराष्ट्र नगरपालिका अधिनियम, 1965 व मुंबई प्राथमिक शिक्षण अधिनियम, 1947 मध्ये आवश्यक त्या दुरुस्त्या अध्यादेशाच्या अनुसूचित दर्शविल्याप्रमाणे करण्यात आल्या आहेत.

3) महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांनी त्यांच्या दुय्यम सेवांमध्ये सेवा भरतीची व्यवस्था, संबंधित प्रशासकीय विभागांमार्फत शासनाकडून दिल्या गेलेल्या किंवा दिल्या जाणा-या निदेशांच्या अधीन राहून, स्वतः करावी.

6. विविध जिल्हा परिषदांसाठी विभागीय व जिल्हा निवड मंडळे स्थापन करण्यासंबंधीची आवश्यक कार्यवाही ग्राम विकास विभागाने तात्काळ करावी अशी त्या विभागास विनंती करण्यात येते.

7. नगरविकास विभाग आणि शिक्षण व सेवायोजन विभाग यांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांनी नगरपालिका व नगरपालिकांची शाळा मंडळे यांच्या दुय्यम सेवामध्ये सेवा भरती करण्यासाठी समुचित निवड यंत्रणा स्थापन करण्याबाबत योग्य त्या सूचना नगरपालिकांना द्याव्या.

8. महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ आणि महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांना आवश्यक त्या सूचना देण्याची विनंती अनुक्रमे उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (ऊर्जा) व गृह विभाग (परिवहन) यांना करण्यात येते.

9. मंत्रालयाच्या सर्व विभागांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांनी स्वतःच्या नियंत्रणाखालील विविध नियुक्ती प्राधिका-यांना सहाय्य करण्यासाठी निवड समित्या स्थापन करण्याबाबत कार्यवाही तात्काळ करावी.

10. वर परिच्छेद 3 मध्येच नमूद केल्याप्रमाणे काही विशिष्ट नेमणुका विधिग्राह्य करण्याची तरतूद उपरोक्त अध्यादेशात केली आहे. ही तरतूद अध्यादेशाच्या कलम 4 मध्ये अंतर्भूत आहे. या तरतुदीचा मथितार्थ असा आहे की, अध्यादेश अंमलात येणाच्या दिनांकास सेवेत असलेली प्रत्येक व्यक्ती, ती निवड मंडळाकरवी नामनिर्देश किंवा शिफारस होऊन नियुक्त झालेली नसली तरीही, खालील अटी पूर्ण होत असल्यास वैधरित्या नियुक्त झाली आहे असे मानण्यात यावे :-

अ) राज्य शासनाच्या सेवेतील नेमणुकांच्या प्रकरणी मूळ नेमणूक -

1) संबंधित पदाविषयीच्या त्यावेळी अंमलात असलेल्या सेवा प्रवेश नियमांतील विहित वयोमर्यादा व किमान अर्हता याबाबतच्या तरतुदींशी सुसंगत असावयास हवी.

2) सेवायोजन कार्यालय, समाजकल्याण अधिकारी किंवा शासन सेवेसाठी उमेदवारांची शिफारस करण्यासाठी शासनाने प्राधिकृत केलेल्या मागासवर्गीयांच्या संघटना यांनी शिफारस केलेल्या किंवा 1977-78 च्या संपकालीन कर्मचा-यांच्या यादीमधून जिल्हाधिका-यांनी शिफारस केलेल्या उमेदवारांमधून झालेली असावयास हवी.

3) मागासवर्गीय व्यक्ती, आर्थिकदृष्ट्या दुर्बल गट, माजी सैनिक, शारीरिकदृष्ट्या अपंग व्यक्ती अथवा इतर कोठल्याही प्रवर्गासाठी पदे राखीव ठेवण्यासंबंधी शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांशी सुसंगत असावयास हवी.

ब) जिल्हा परिषदा, नगरपालिका, नगरपालिकांची शाळा मंडळे, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांच्या सेवेतील नेमणूकांच्या प्रकरणी मूळ नेमणूक, नेमणुकीच्या वेळी अंमलात असलेले, नेमणुकीच्या पदाशी संबंधीत प्राधिकरणाने केलेले नियम, विनियम वा आदेश किंवा शासनाने दिलेले आदेश यांच्याशी सुसंगत असावयास हवी.

मंत्रालयाच्या सर्व विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या नियंत्रणाखालील नियुक्ती प्राधिकारी निवड मंडळाचा विचार घेतल्याशिवाय केलेल्या नेमणुकांच्या सर्व प्रकरणांची तपासणी करतील व वर नमूद केलेल्या अटी ज्यांच्या बाबतीत पूर्ण होतात अशा सर्व नेमणूका तीन महिन्यांच्या कालावधीत नियमित करतील, याची त्यांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
वि. ति. चारी,
शासनाचे सचिव.